# मानवी स्नेहसंबंध
# आणि इस्लाम

लेखक

**मुहम्मद फारुक खान**

भाषांतर

**शाहजहान मगदुम**

त्याग, विशालहृदयता आणि प्रेम याचेच नाव जीवन आहे. जेथे कंजूसपणा, संकीर्णता आणि द्वेष आढळतो, तेथे जीवनाचा नव्हे मृत्यूचा संचार प्रभावकारी असतो. मरण पावलेल्या माणसाकडून आपण कोणतीही आशा करू शकत नाही. सर्व आशा जीवनाशी निगडीत असतात. व्यक्तिमत्त्वाच्या परिपूर्णतेचे रहस्य वास्तविकपणे दानशीलतेत आणि उदारहृदयतेत सामावलेले असते. सर्वसाधारणपणे या वास्तविकतेबाबत लोक गाफील असल्याचे आढळून येतात. यामुळेच ते जीवनाच्या सुख-समृध्दीपासून वंचित राहतात. त्यांना शांती व समाधान प्राप्त होत नाही ज्यांची आपल्याला सर्वात जास्त आवश्यकता असते. अशाप्रकारच्या अनुदारता व संकुचितपणापासून स्वत:ला अलिप्त ठेवण्याची शिकवण धर्माने निरंतर दिली आहे. वास्तविकपणे आमच्या आवश्यकता व नैसर्गिक इच्छांवरच धर्माचा पाया रचण्यात आला आहे. कुरआनमध्ये स्पष्ट शब्दांत म्हटले आहे,

''आणि जे लोक मनाच्या संकुचितपणापासून वाचविले गेले तेच साफल्य प्राप्त करणारे आहेत.'' *(कुरआन, ५९:९)*

अनुदारता व संकुचितपणामुळे माणसाचे जीवन कटुता व काट्याकुट्यांनी माखून जाते, इतकेच नव्हे तर त्यामुळे अनेक जण सत्य प्राप्त करण्यापासून वंचित राहतात. इस्लामने कशा तऱ्हेने प्रत्येक प्रकारच्या संकीर्णतेपासून वाचवून सर्वच मानवांना एकत्र आणि संघटित राहण्याची शिकवण दिली आहे आणि मग कशाप्रकारे त्याने या एकते (Unity) चा आकार-प्रकार आणि तिच्या आवश्यकतेचे विस्तृतपणे वर्णन केले आहे, हे दाखवून देण्याचा आम्ही इथे प्रयत्न करणार आहोत.

सर्व लोकांनी एक समुदाय बनून राहावे, ज्याप्रमाणे ईश्वराने त्यांना एका समुदायाच्या स्वरुपात निर्माण केले आहे. हीच इस्लामची शिकवण आहे. कुरआनमध्ये आहे.

''सर्व लोक एकच समुदाय आहेत.'' *(कुरआन, २:२१३)*

हे परिवार, वंश इत्यादी फक्त ओळखण्यासाठी आहेत, जेणेकरून मनुष्याने आपल्या नातेवाईकां-बाबतचे कर्तव्य पार पाडावे. लोकांमध्ये भेद निर्माण व्हावेत आणि ते परस्पर एकमेकांशी भांडावेत असा त्याचा उद्देश कदापि नाही. प्रतिष्ठा व महानतेचा परिचायक वंश व कुळाची श्रेष्ठता अथवा इतर एखादी वस्तू नसून सदाचरण व

ईशपरायणता आहे. कुरआनमध्ये स्पष्ट करण्यात आले आहे.

"हे लोकहो, आम्ही तुम्हाला एका पुरूष व एका स्त्रीपासून निर्माण केले, आणि मग तुमची राष्ट्रे व लोकसमूह बनविले जेणेकरून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वास्तविकत: अल्लाहजवळ तुमच्यापैकी सर्वात जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वात जास्त ईशपरायण आहे. निश्चितच अल्लाह सर्व काही जाणणारा आणि खबर राखणारा आहे." *(कुरआन, ४९:१३)*

आम्ही सर्वांशी प्रेम करावे सर्वांचे शुभचिंतक बनून राहावे. सेवाकार्यातून अंग काढून घेऊ नये, शेजाऱ्यांचा आदर करावा आणि उपद्रव व बिघाडाचा तिरस्कार करावा या इस्लामच्या शिकवणी आहेत. या शिकवणींपैकी प्रत्येकाच्या बाबतीत या ठिकाणी काही आवश्यक बाबींचे विवेचन करण्यात येत आहे. जे वास्तविकत: उद्देशप्राप्तीसाठी पुरेसे असेल.

## प्रेम

आपणास ठाऊक आहे की जीवन आपल्या पूर्णरूपात प्रेमातून प्रकट होत असते. आम्हाला परस्पर जोडणारी व जोडून ठेवणारी वस्तू प्रेमच असते.

पैगंबर मुहम्मद (स.) सांगतात, ''मनुष्य त्याच्याबरोबरच असेल ज्याच्याशी त्याला प्रेम असेल.''

मोमिन (श्रध्दावंत) ची ओळख अशी सांगितली की, ''श्रध्दावंत स्नेहाची खाण असतो.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आणखी एक कथन आहे, ''परस्पर प्रेम, दयाळूपणा आणि ममता यामध्ये श्रध्दावंतांना एका शरीराची उपमा असते. जेव्हा शरीराच्या एखाद्या भागात त्रास होऊ लागतो तेव्हा संपूर्ण शरीर त्या भागासह अनिद्रा व ज्वरग्रस्त होते.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे असेही कथन आहे, ''ईश्वर स्पष्टोक्ती आहे की जे लोक माझ्यासाठी एकमेकांशी स्नेह बाळगतात, एकमेकांजवळ बसतात, एकमेकांच्या भेटी घेतात आणि आपसांत एकमेकांवर खर्च करतात त्या लोकांसाठी माझे प्रेम अनिवार्य बनते.''

## मधुर वचन

आपल्या संभाषणात प्रेमाची झलक आणि माधुर्य आढळणे हा नैतिकता व प्रेमाचा स्वाभाविक परिणाम आहे. आपले संभाषण गोड आणि मनमोहक असावे. नीरसतेच्या वृत्तीपासून आपण दूर राहावे.

इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण आहे,

''आपल्या भावाशी हसत बोलणेदेखील तुझ्याकरिता दान (सदका) आहे.''

तसेच -

''अंतिम निवाड्याच्या दिवशी (जेव्हा कर्माचे मोजमाप होईल) कर्मतुळेत सद्‌वृत्ती व सुशीलता यापेक्षा वरचढ कोणतीही वस्तू जड असणार नाही. नि:संदेह, ईश्वर अपशब्द बरळणाऱ्यांना खूपच वाईट समजतो.''

## लोककल्याणाची चेतना

आम्ही एकमेकांचे शुभचिंतक असणे ही परस्पर प्रेम व उदारतेची परिणती आहे. सर्व लोकांचे सौख्य व कल्याणावर आपण लक्ष केंद्रित करायला हवे. कोणाचेही अहित (वाईट) व्हावे अशी आपण इच्छा बाळगू नये. यासंदर्भात ईश्वराचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या वचनांचे अवलोकन करावे.

''जोपर्यंत तुम्ही स्वत:करिता पसंत करता ते आपल्या शेजाऱ्याकरिता पसंत करीत नाही, तोपर्यंत तुमच्यापैकी कोणीही श्रध्दावंत असणार नाही.''

*(हदीस : मुस्लिम)*

''आपसात ईर्षा करू नका आणि आपसात वैर बाळगू नका आणि आपसात एकमेकांचे संबंध तोडू नका. अल्लाहचे दास आणि भाऊ भाऊ बनून राहा.''

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

''जो इतरांवर दया करीत नाही, अल्लाहदेखील त्याच्यावर दया करणार नाही.'' *(हदीस : अबू दाऊद, तिर्मिजी)*

''दया करणाऱ्यांवर अल्लाह दया करतो, तुम्ही पृथ्वीवासियांवर दया करा, तुमच्यावर आकाशवाला (अल्लाह) दया करील.'' *(हदीस : अबू दाऊद)*

''अल्लाहला जे दास आवडतात, तो त्यांच्या मनात (हृदयात) दया उत्पन्न करतो. जे दयावान व नम्र स्वभावाचे असतात त्यांच्यावरच अल्लाह दया करतो.''

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

## जनसेवा

सेवेविना आमचे प्रेम आणि आमची उदारता विश्वसनीय नाही. पवित्र कुरआन स्पष्ट आदेश देत आहे,

''आणि उपकार कर ज्याप्रमाणे अल्लाहने तुझ्यावर उपकार केले आहेत आणि जमिनीवर उपद्रव माजविण्याचा प्रयत्न करू नकोस अल्लाहला उपद्रव आवडत नाही.'' *(कुरआन, २८:७७)*

"Do good as God has been good to thee." च्या सिध्दान्ताची मानव जेव्हा उपेक्षा करतो तेव्हा जमिनीवर उपद्रव माजतो. जर लोकांनी या पायाभूत नियमाचे आणि सिध्दान्ताचे अनुसरण केले तर पृथ्वीवरील उपद्रव (दंगाबखेडा) कायमचा समाप्त होईल.

पवित्र कुरआनच्या दुसऱ्या एके ठिकाणी सांगण्यात आले आहे,

''आणि तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आईवडिलांशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा. आणि आप्तशेजारी अनोळखी शेजारी तोंड ओळख असणारा साथीदार व वाटसरू आणि त्या दासी व दास जे तुमच्या ताब्यात असतील, त्यांच्याशी उपकाराचे व्यवहार करा, विश्वास ठेवा की अल्लाह एखाद्या अशा व्यक्तीला पसंत करत

नाही जी आपल्या अहंभावात गर्विष्ट असते व आपल्या मोठेपणावर अभिमान करीत असते. (कुरआन, ४:३६)

पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण आहे -

''सर्व लोक ईश्वराचे कुटुंब (Family of God) आहे. यास्तव लोकांपैकी ईश्वरापाशी सर्वांत उत्तम ती व्यक्ती आहे जी त्याच्या कुटुंबाशी सद्व्यवहार करील.''

तसेच -

''अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाह जाब विचारील, हे आदमपुत्रा (अर्थात- मानव) मी आजारी पडलो, परंतु तू माझी विचारपूस केली नाहीस. तो म्हणेल, हे माझ्या पालनकर्त्या! मी तुझी सेवा कशी करेन, तू तर संपूर्ण जगाचा पालनहार आहेस? (तू आजारी पडूच शकत नाहीस!) अल्लाह म्हणेल, माझा अमुक दास आजारी होता हे तुला माहीत नव्हते काय? आणि तू त्याची सेवा केली नाहीस. तुला काय ठाऊक जर तू त्याची सेवा केली असती तर मी त्याच्या निकट आढळलो असतो.

''हे आदमपुत्रा! मी तुला जेवण मागितले आणि तू मला जेवू घातले नाहीस. तो म्हणेल, हे पालनकर्त्या, तुला मी कसे बरे जेवू घालावे तू तर साऱ्या जगाचा पालनकर्ता आहेस? अल्लाह म्हणेल, माझ्या अमुक दासाने तुला जेवण मागितले, परंतु तू त्याला जेवण दिले नाहीस. तुला हे माहीत नाही काय, जर तू त्याला जेवू घातले असते तर तो त्याच्या निकट आढळला असता.

''हे आदमपुत्रा! मी तुला पाणी मागितले, परंतु तू मला पाणी दिले नाहीस. तो म्हणेल, हे पालनकर्त्या, मी कसे तुला पाणी पाजू शकतो, तू तर स्वतः संपूर्ण जगाचा स्वामी आहेस. अल्लाह म्हणेल, माझ्या अमुक दासाने तुला पाणी मागितले होते, परंतु तू त्याला पाणी पाजले नाहीस. तुला हे ठाऊक नाही काय, जर तू त्याला पाणी पाजले असते तर तुला तो माझ्यापाशी आढळला असता.'' *(हदीस : मुस्लिम)*

अल्लाह आपल्या दासांच्या भुकेला आपली भूक, त्यांच्या तहानेला आपली तहान, त्यांच्या आजाराला व त्रासाला आपला त्रास समजत असतो, मात्र मानव, मानवाचा शत्रू बनतो. अल्लाहला पसंत असलेला गुण मानवाने आपल्यात निर्माण केला असता तर किती बरे झाले असते!

## - उपद्रवाचा तिरस्कार -

जे लोक उपद्रव व बिघाड यांची घृणा करतात आणि जगात शांतता प्रस्थापित व्हावी असे ज्यांना वाटते ते लोक सद्‌वर्तनी असतात. मानवांनी आपसात मिळून मिसळून राहावे आणि कोणत्याही प्रकारचे दंगे व उपद्रवापासून दूर राहावे यासाठी असे लोक आटोकाट प्रयत्न करीत असतात.

जो धर्म प्रेमाची शिकवण देण्यासाठी आलेला असेल तो कधीही उपद्रव पसंत करू शकत नाही. याच कारणास्तव कुरआनमध्ये ठिकठिकाणी उपद्रवापासून दूर राहाण्याची ताकीद देण्यात आली आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

''आणि अल्लाहला उपद्रव पसंत नाही.'' *(कुरआन, २:२०५)*

इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण आहे, ''जो उपद्रवापासून अलिप्त राहातो आणि संकटसमयी संयमाने वागतो तोच सदाचारी मनुष्य असतो.''

*(हदीस : अबू दाऊद)*

''सन्मार्ग प्राप्त केल्यानंतर कोणताही समुदाय जोपर्यंत भांडण तंट्यात पडत नाही तोपर्यंत तो सत्य-मार्गापासून भटकू शकत नाही.''

✻ समाप्त ✻